दोन किंवा अधिक पदांवरील नियुक्त्यांच्या कालावधीतील अतिरिक्त वेतन / विशेष वेतनाच्या दरात सुधारणा करणे.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय क्रमांक : वेतन १३११/प्र.क्र.१७ /सेवा-३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.दिनांक : २७ डिसेंबर, २०११

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक :वेतन १३९०/प्र. क्र.२/९०/सेवा ८,दिनांक १० मे, १९९०
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक :वेतन १३९०/प्र. क्र.६५/९०/सेवा-३, दिनांक ४ डिसेंबर, १९९०
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक :वेतन १४९१/प्र. क्र.१२८/९१/सेवा-३, दिनांक २९ मार्च, १९९४
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक :असंक १००१/प्र. क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा दि. १० सप्टेंबर, २००१
५) शासन निर्णय वित्त विभाग, क्र.वेतन २०००/प्र.क्र.५/सेवा-३, दिनांक २३ मे,२००६
६) शासन अधिसूचना,वित्त विभाग, क्रमांक :वेपूर१२०९/प्र. क्र.२७/सेवा ९ दिनांक २२ एप्रिल, २००९

**प्रस्तावनाः-**

महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम ५६ नुसार, शासकीय कर्मचा-याकडे त्याच्या पदाव्यतिरिक्त दुस-या एक किंवा अधिक पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात आल्यास, विशेष वेतन देय होते. वित्त विभागाच्या उपरोक्त दिनांक २३ मे, २००६ च्या शासन निर्णयान्वये कर्मचा-याकडे दुस-या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात आल्यास कर्मचा-यास अशा दुसऱ्या पदाकरीता त्या पदाच्या संभाव्य वेतनाच्या ५ टक्के दराने परंतु दरमहा रू. ७५० इतक्या मर्यादेपर्यंत अतिरिक्त वेतन/विशेष वेतन अनुज्ञेय केले होते. वित्त विभागाच्या उपरोक्त दिनांक २२ एप्रिल, २००९ च्या अधिसूचनेन्वये सहाव्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने शासकीय कर्मचा-यांच्या वेतनश्रेणीत सुधारणा करण्यात आली असून त्यासंबंधीचे महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९ हे दिनांक १ जानेवारी, २००६ पासून अंमलात आले आहेत. सदर सुधारित वेतन संरचना विचारात घेऊन अतिरिक्त कार्यभारासाठी अनुज्ञेय अतिरिक्त वेतन / विशेष वेतनाच्या दरात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

सहाव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन संरचना विचारात घेऊन अतिरिक्त कार्यभारासाठी अतिरिक्त वेतन / विशेष वेतन खालीलप्रमाणे अनुज्ञेय होईल.

अ) महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम ५६ नुसार, शासकीय कर्मचा-याकडे स्वतःच्या पदाव्यतिरिक्त दुस-या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविल्यास, अशा दुस-या पदाकरीता यापुढे त्या पदाच्या संभाव्य वेतनाच्या ५ टक्के दराने, परंतु दरमहा रू.१५००/- एवढ्या कमाल मर्यादेपर्यंत, अतिरिक्त वेतन /विशेष वेतन अनुज्ञेय राहील.

ब) अखिल भारतीय सेवेसह सर्व स्तरावरील शासकीय अधिकाऱ्यांना / कर्मचाऱ्यांना अतिरिक्त कार्यभारासाठी अतिरिक्त वेतन/विशेष वेतन अनुज्ञेय होईल. अखिल भारतीय सेवेतील राज्य शासनाकडे कार्यरत असलेल्या अधिकाऱ्यांना भारतीय प्रशासकीय सेवा (वेतन) नियम, २००७ मधील नियम १० (बी) च्या तरतुदी विचारात घेवून अतिरिक्त कार्यभारासाठी अतिरिक्त वेतन/विशेष वेतन अनुज्ञेय करण्यात येत आहे.

क) महागाई भत्ता तसेच घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता देण्याच्या प्रयोजनार्थ सदर अतिरिक्त वेतन/विशेष वेतन यापुढेही विचारात घेतले जाणार नाही.

ड) एका वर्षाच्या कालावधीसाठी अतिरिक्त वेतन/विशेष वेतन मंजुर करण्याबाबत उपरोक्त दिनांक २३/५/२००६ येथील शासन निर्णयान्वये विभाग प्रमुख / प्रादेशिक प्रमुखांना प्रदान केलेले अधिकार यापुढे खाली नमूद केलेल्या अधिका-याच्या बाबतीत वापरण्यात यावेत :-

(१) वेतनबँड रु.१५६०० - ३९१०० या वेतन संरचनेतील ज्या पदाचे ग्रेड वेतन रु.६६०० हून कमी आहे, अशा दुस-या गट-अ च्या पदाच्या अतिरिक्त कार्यभार धारण करणा-या त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली गट-अ चा अधिकारी

(२) वेतनबँड रू. १५६०० - ३९१०० या वेतन संरचनेतील ज्या पदाचे ग्रेड वेतन रू. ६६०० हून कमी आहे, अशा दुस-या गट-अ च्या पदाचा अतिरिक्त कार्यभार धारण करणारा गट-ब चा अधिकारी.

२. उपरोक्त शासन निर्णय दिनांक २३ मे, २००६ नुसार महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ५६ नुसार अतिरिक्त कार्यभारासाठी विशेष वेतन मंजूर करताना, सदर शासन निर्णयाच्या परि-३ (अ) (ब) (क) येथील अटी विचारात न घेताच अतिरिक्त कार्यभार देण्यात येतो व त्यानंतर मंजूरीसाठी प्रस्ताव शासनाकडे पाठविण्यात येतो, असे निर्दशानास आले आहे. याबाबत पुन्हा स्पष्ट करण्यात येते की, अतिरिक्त कार्यभाराच्या प्रत्येक प्रकरणी शा.नि. दि.२३/५/२००६ मधील परि.३ येथील खालील अटींची पूर्तता होत असल्याची संबंधित कार्यालय प्रमुखांनी/विभाग प्रमुखांनी/प्रशासकीय विभागांनी खात्री करून घेणे आवश्यक आहे.

अ) ज्या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात आला असेल ते पद कर्मचाऱ्याने धारण केलेल्या पदास दुय्यम नसावे.

ब) कामात व जबाबदारीत विशिष्ट वाढ झालेली असावी.

क) ज्या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात येणार आहे त्यास स्वतंत्र अधिकारीता असावी.

३. अतिरिक्त कार्यभाराची व्यवस्था खालीलप्रमाणे करता येईल :-

अ) पद प्रथम रिक्त झाल्यापासून एक वर्षापर्यंतच्या कालावधीसाठी अतिरिक्त कार्यभाराची व्यवस्था व त्यासाठी विशेष वेतन मंजूर करण्याचे अधिकार संबंधित विभाग प्रमुख / प्रादेशिक विभाग प्रमुख यांना राहतील.

त्यानंतर पुढील एक वर्षापर्यंतच्या कालावधीसाठी अतिरिक्त कार्यभाराची व्यवस्था व त्यासाठी विशेष वेतन मंजूर करण्याचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागांना राहतील.

ब) उपरोक्त शासन निर्णय दि.१०/९/२००१ मधील आदेशानुसार सहा महिन्यापेक्षा अधिक काळ रिक्त राहूनही व्यपगत न होणाऱ्या पदांच्या बाबतीत हे अधिकार यापुढेही चालू ठेवण्यात यावेत. मात्र, सहा महिन्यापेक्षा अधिक काळ रिक्त राहिल्याने व्यपगत होणाऱ्या पदांचा अतिरिक्त कार्यभार ६ महिन्यापेक्षा जास्त काळ सुरु ठेवता येणार नाही.

क) दोन वर्षापुढे अतिरिक्त कार्यभार सुरु ठेवावयाचा असेल अशा प्रकरणी दोन वर्षाचा कालावधी संपण्यापूर्वी सामान्य प्रशासन विभाग आणि वित्त विभागाची पुर्वानुमती घेणे आवश्यक आहे. पूर्वपरवानगी न घेता अतिरिक्त कार्यभाराची व्यवस्था दोन वर्षापेक्षा अधिक काळ चालू राहिल्यास कार्योत्तर मंजूरीचे प्रस्ताव विचारात घेतले जाणार नाहीत.

ड) वरील तरतूदींचे पालन न करता दोन वर्षापेक्षा जास्त काळ अतिरिक्त कार्यभार चालू ठेवणाऱ्या व त्यासाठी विशेष वेतन मंजूर करणाऱ्या संबंधित अधिकाऱ्यांच्या विरुध्द जबाबदारी निश्चित करुन, त्यांच्या विरुध्द शिस्तभंगविषयक कार्यवाही प्रशासकीय विभागाने करावी.

४. या आदेशातील तरतुदीनुसार सुधारित दराने विशेष वेतन दिनांक १/१/२०१२ पासून देय होईल. दि.१/६/२००६ ते दि. ३१/१२/२०११ पर्यंत उपरोक्त दि.२३/५/२००६ च्या आदेशानुसार अतिरिक्त कार्यभाराचे विशेष वेतन पाचव्या वेतन आयोगातील वेतनश्रेणीनुसार अनुज्ञेय होईल.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम ५६ व त्यामधील परिशिष्ट एक अ.क्र.१४ मधील याबाबतच्या विद्यमान तरतुदी या शासन निर्णयातील तरतुदीपुरत्या सुधारण्यात आल्या आहेत, असे मानण्यात यावे. या नियमात व परिशिष्टात यथावकाश सुधारणा करण्यात येतील.

६. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१७२४/११/१२ व क्र.८३/९, दि.५/११/२०११ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक२०१११२२७११४३३०१२३०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( उध्दव दहिफळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व विधानमंडळ सदस्य
मंत्रालयीन सर्व विभाग
सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय,मुंबई.
# प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
# प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
# सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
# सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
# प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
#आयुक्त, राज्य माहिती आयोग, (सर्व)
# सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई.
#प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/नागपूर/औरंगाबाद.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषदा
महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड. पुणे
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई /पुणे/ नागपूर/ औरंगाबाद /नाशिक/ अमरावती.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई/नागपूर/पुणे/औरंगाबाद.
वित्त विभागातील सर्व कार्यासने
सामान्य प्रशासन विभाग कार्यासन ९ व १२, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
निवड नस्ती, वित्त विभाग (सेवा-३)
# पत्रानें